**शिवकालीन पाणी साठवण**
**योजना मार्गदर्शक सूचना**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. आपना १०१०/प्र.क्र.२५३/ पापु.१५**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक- १३ सप्टेंबर, २०१०**

**वाचा:-**

१. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापापु १००१/प्र.क्र.३३०/पापु ०७ दिनांक १४ फेब्रुवारी,२००२
२. शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापापु १००४/प्र.क्र.२४/पापु ०७ दिनांक २५ मे,२००४
३. शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापाधो-११०८/प्र.क्र.५३/पापु ०७ दिनांक १० जून,२००८

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये, भूजलाधारित नळ पाणी पुरवठा योजनांच्या स्त्रोतातील भूजल उपलब्धतेत सातत्य रहावे म्हणून पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोत बळकटीकरण्याच्या पारंपारिक व अपारंपारिक उपाययोजनांचा, घराच्या /इमारतीच्या छतावर पडणारे पावसाचे पाणी संकलनाच्या उपाययोजनांचा, डोंगरी भागात खडकातील टाक्या बांधून पावसाचे पाणी साठविण्यासारख्या उपाययोजना व इतर उपाययोजनांचा समावेश असलेली **शिवकालीन पाणी साठवण योजना** राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. सदर योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी संदर्भक्र.२ व ३ येथील शासन परिपत्रकान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

शिवकालीन पाणी साठवण योजनेअंतर्गत निवड केलेल्या गावांमध्ये ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीने शाश्वत भूजल व्यवस्थापन व उद्‌भव बळकटीकरण करणेसाठी कृति आराखडा तयार करुन तो वरिष्ठ भूवैज्ञानिकांना सादर केल्यानंतर, वरिष्ठ भूवैज्ञानिकांनी अशा प्रस्तावांची छाननी करुन, क्षेत्रीय भेटीअंती_आवश्यकता असल्यास, प्रस्तावात दुरुस्ती करण्यास संबंधित ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीस मार्गदर्शन करुन योग्य त्या दुरुस्तीनंतर परिपूर्ण प्रस्ताव जिल्हा समितीसमोर मंजूरीसाठी सादर करावा तसेच, शिवकालीन पाणी साठवण योजनांची अंमलबलावणी व त्याची फलनिष्पती याबाबतचे अंतर्गत मुल्यांकन जिल्हा , विभाग व राज्य स्तरावरील भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या कक्षामार्फत करण्याच्या सूचना दि.१० जून २००८ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत. तथापि, सदर सूचनांचे पालन योग्य रीतीने होत नसल्याचे, निदर्शनास आले आहे. शिवकालीन पाणी साठवण योजने अंतर्गत घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांचे योग्य प्रकारे पर्यवेक्षण होत नसणे, कामे वेळेवर पूर्ण न होणे, निकृष्ट दर्जाचे बांधकाम होणे, निधीच्या हाताळणीमध्ये अनियमितता होणे यासारख्या बाबी निदर्शनास आल्या आहेत. या बाबी विचारात घेता, शिवकालीन पाणी साठवण योजनेअंतर्गत घेण्यात येणारी कामे विहित कालावधीत पूर्ण व्हावीत,

दर्जेदार व्हावीत व उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा सुयोग्य वापर व्हावा यासाठी काही मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन परिपत्रक :-</u>**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन, शासन पुढीलप्रमाणे सूचना देत आहे.

१) कृती आराखडयात प्रस्तावित असलेल्या कामांचे स्थळ निश्चितीपासून ते योजना कार्यान्वित होईपर्यंतच्या सर्व टप्प्यांमध्ये संबंधित अधिकाऱ्यांनी (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, वरिष्ठ भूवैज्ञानिक ) जाणीवपूर्वक पर्यवेक्षण करावे.

२) संदर्भ क्र.३ येथील दिनांक १० जून २००८ च्या शासन परिपत्रकातील सूचना क्र.१० व ११ कडे लक्ष वेधण्यात येत आहे. अनेकदा प्रस्तावित कामांना पहिला हप्ता म्हणून ४० टक्के रक्कम वितरीत केली जाते. तथापि, ही कामे निर्धारीत वेळेत सुरु केली जात नाहीत. परिणामी, निधीचा सुयोग्य वापर होत नाही. अशा परिस्थितीत नियोजित कामे वेळीच सुरु होतील याची दक्षता घेण्यात यावी. गावांना वितरित केलेल्या निधीतून प्रस्तावित कामे विहित कालावधीत केली जात आहेत किंवा कसे, याबाबत वरिष्ठ भूवैज्ञानिकांनी लक्ष ठेवून ज्या गावांमध्ये वितरणानंतर ४५ दिवसात कामे सुरु करण्यात आलेली नाहीत अशा गावांना नोटीसा देऊन, १ महिन्याच्या कालावधीत प्रगती दिसून आली नाही तर निधी परत घेण्याची कार्यवाही करावी . याबाबत वरिष्ठ भूवैज्ञानिकांनी वेळोवेळी आढावा घेऊन, सदर बाब वरिष्ठांच्या निदर्शनास आणून द्यावी. याबाबतचा अहवाल वरिष्ठ भूवैज्ञानिकांनी उपसंचालक व संचालकांमार्फत शासनास सादर करावा.

३) वरिष्ठ भूवैज्ञानिकांनी संबंधित ठेकेदारांकडून योग्य दर्जाच्या साहित्याचा वापर होत असल्याची खातरजमा करावी. संबंधित ठेकेदारांकडून निकृष्ट दर्जा/दुय्यम दर्जाच्या साहित्याचा वापर होत असल्यास, ती बाब मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या निदर्शनास आणण्यात यावी. ठेकेदारांकडून विहित निकषाप्रमाणेच कामकाजाचा तसेच साहित्याचा दर्जा राखला जाईल याची दक्षता घ्यावी.

४) कामाचा अंतिम हप्ता देण्यापूर्वी, शिवकालीन पाणी साठवण योजनेच्या उद्देशाची फलनिष्पत्ती व योजनांची अंमलबजावणी याबाबतचे अंतर्गत मूल्यांकन वरिष्ठ भूवैज्ञानिकांमार्फत करण्यात यावे.

५) तदनंतरही शिवकालीन पाणी साठवण योजनेअंतर्गत घेण्यात आलेल्या कामांचे बांधकाम निकृष्ट दर्जाचे झाल्याचे आढळून आल्यास तसेच आर्थिक अनियमितता निदर्शनास आल्यास,संबंधित बाबींची तक्रार जिल्हा पोलीस अधिक्षक यांच्याकडे दाखल करावी, अन्यथा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कार्यकारी अभियंता , तसेच वरिष्ठ भूवैज्ञानिक यांना जबाबदार धरण्यात येईल.

६) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनीही त्यांच्या विभागांतर्गत घेण्यात येणाऱ्या शिवकालीन पाणी साठवण योजनांच्या कामांचा नियमित आढावा घेऊन त्याचा अहवाल संचालकांमार्फत शासनास सादर करावा.

७) शिवकालीन पाणी साठवण योजनेअंतर्गत घेण्यात आलेल्या कामांचा अहवाल शासनास सादर करताना, योजना सुरु झाल्यापासुनची कामे एकत्रित स्वरुपात दिली जातात. यापुढे मंजूर कामे, त्यापैकी हाती घेण्यात आलेली

कामे, प्रत्यक्षात पूर्ण करण्यात आलेली कामे, उपलब्ध करुन दिलेला निधी याची माहिती वर्षनिहाय व जिल्हानिहाय सादर करण्यात यावी.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१००९१३१५३३५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल याच्या आदेशानुसार व नावाने,

-सही-

**(मालिनी वि.शंकर)**

**प्रधानसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. विभागीय आयुक्त (सर्व)
२. जिल्हाधिकारी (सर्व)
३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
४. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
५. सर्व विभागीय उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
६. सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
७. उप अभियंता, (यांत्रिकी) भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, जिल्हा परिषद (सर्व)
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई.
९. मुख्य अभियता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१०. कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
११. उप अभियंता, पाणी पुरवठा व स्वच्छता उप विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१३. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
१४. वित्त विभाग ( व्यय-३, अर्थसंकल्प -२०)
१५. ग्राम विकास व जलसंधारण विभाग (जल-२ व जल-४ क्र २५ व २७)
१६. प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक
१७. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासन अधिकारी
१८. निवड नस्ती (पापु.१५)